# E Book 103 भाग ४

# एबा कोच

# “दि कंप्लीट ताजमहाल” - पुस्तक परिचय

१२. ताजमहालावर जे कोरीव लेखनकाम करून केले आहे त्याची भाषा व लिपी कोणती ते? लिहिलेले वाचता येते का?

कोरून लिहिलेल्या पट्टीवर कारागिरांनी आपली नावे त्यात लिहिली आहेत?

एबा कोच यांनी अरबी व फारसी भाषेत अत्युच्च दर्जाच्या लेखन शैलीच्या कारागिरांची नावे त्यांनी नोंदलेली आहेत असे आवर्जून लिहिले आहे. हे लेखन नेमके कुठे पहायला मिळेल? ते कोण यावर त्या म्हणतात...



खोट्या कबरीच्या खोलीत दक्षिणे कडील कमानीवरील पट्टीत ते सापडेल. त्यात शेंदरी चौकोनात १०४५ हिजरी असे आहे. तर खालील पिवळ्या चौकोनात अनामत खान अशी सही केली आहे. 'नक्ष' लेखन शैलीत आहे तर सही 'सुलूस' नावाच्या लिपीत सादर केली होती) (French word - cartouches - उच्चार कारतूश - सही किंवा नावासाठी दिलेली जागा) हे लेखन वाचू शकणाऱ्यांनी यावर अभ्यास करून आपले मत सांगावे की सही अरेबिकमधे आहे कि फारसीत? तारीख पुर्ण आहे की फक्त साल? कारण एबांच्या पुस्तकात संदिग्धता आहे.

*जिलूखाना इमारतीवरील इवानातील (आत गेलेला भागाच्या कमानी वरील) पिश्ताक (शीर्ष पट्टीचा भाग) उभ्या दांड्या व त्यातल्या मजकुराला आडवी लांबसर आखीव काट म्हणजे ते अरेबिक मधील कुराणातील आयते लिहिलेले आहेत. *ताजमहलाकडे जाताना ज्या दरवाज्यातून जावे लागते तो दरवाजा.



या शीलालेखातून असा काय संदेश मानवतेला दिला गेला आहे यावर एबा कोच पान २२६वर लिहितात... (Sura is 89, al-Fajr, 'Daybreak',) ताजमहालच्या शिलालेख कार्यक्रमाची थीम मृत्यूनंतरच्या जीवनावर आधारित

(आहे). कुराणातील सुरा (प्रकरणे), किंवा त्यातील आयते (परिच्छेद,) (अंतिम) दिवसाच्या एकनिवाडा, दिव्य दया आणि स्वर्ग लोकांनी विश्वासू लोकांना (दिले गेलेले ) वचन आहे. याच आधारावर ताजमहाल होता असा युक्तिवाद केला जात आहे. ओ इब्न अल अरेबी यांनी गूढ चित्रात सांगितल्याप्रमाणे, देवाच्या सिंहासनाची प्रतिकात्मक प्रतिकृती बनवा. या कल्पनेच्या विरोधात बोलणाऱ्या अनेक मुद्द्यांपैकी एक म्हणजे (सुरा २, श्लोक २५५) चे प्रसिद्ध सिंहासनाचे श्लोक. ते देवाच्या गौरवाचे गुणगान करणारे (आहेत) या शिलालेखात अनुपस्थित

आहे.




تلك الرسل البقرة
تِلْكَ الرُّسُلُ فَضَّلْنَا بَعْضَهُمْ عَلٰى بَعْضٍ
مِنْهُمْ مَّنْ كَلَّمَ اللّٰهُ وَرَفَعَ بَعْضَهُمْ دَرَجٰتٍ
وَاٰتَيْنَا عِيْسَى ابْنَ مَرْيَمَ الْبَيِّنٰتِ وَاَيَّدْنٰهُ بِرُوْحِ
الْقُدُسِ وَلَوْ شَآءَ اللّٰهُ مَا اقْتَتَلَ الَّذِيْنَ مِنْ
بَعْدِهِمْ مِّنْ بَعْدِ مَا جَآءَتْهُمُ الْبَيِّنٰتُ وَلٰكِنِ
اخْتَلَفُوْا فَمِنْهُمْ مَّنْ اٰمَنَ وَمِنْهُمْ مَّنْ كَفَرَ وَلَوْ
شَآءَ اللّٰهُ مَا اقْتَتَلُوْا وَلٰكِنَّ اللّٰهَ يَفْعَلُ مَا يُرِيْدُ
يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْٓا اَنْفِقُوْا مِمَّا رَزَقْنٰكُمْ مِّنْ
قَبْلِ اَنْ يَّاْتِيَ يَوْمٌ لَّا بَيْعٌ فِيْهِ وَلَا خُلَّةٌ وَّلَا شَفَاعَةٌ
وَالْكٰفِرُوْنَ هُمُ الظّٰلِمُوْنَ اَللّٰهُ لَآ اِلٰهَ اِلَّا
هُوَ اَلْحَيُّ الْقَيُّوْمُ لَا تَاْخُذُهٗ سِنَةٌ وَّلَا نَوْمٌ
لَهٗ مَا فِي السَّمٰوٰتِ وَمَا فِي الْاَرْضِ مَنْ ذَا
الَّذِيْ يَشْفَعُ عِنْدَهٗٓ اِلَّا بِاِذْنِهٖ يَعْلَمُ مَا بَيْنَ

....हे प्रेषित (जे आमच्याकडून मानवाच्या मार्गदर्शनाकरिता नियुक्त झाले) आम्ही यांना एक दुसऱ्यापेक्षा वरचढ दर्जे बहाल केले. यांच्यापैकी कोणी असा होता ज्याच्याशी स्वतः अल्लाहने संभाषण केले, कुणाला त्याने दुसऱ्या प्रकारे उच्च दर्जे प्रदान केले आणि शेवटी मरयमपुत्र ईसा-येशू (अ.) यांना दिव्य संकेत बहाल केले आणि पवित्र आत्म्याने त्याला सहाय्य केले. जर अल्लाहने इच्छिले असते तर शक्य नव्हते की या प्रेषितानंतर ज्या लोकांनी उज्ज्वल संकेत पाहिले असते त्यांनी आपसात लढाई केली असती परंतु (अल्लाहचे मनोरथ असे नव्हते की त्याने लोकांना सक्तीने मतभेदापासून रोखावे. या कारणाने) त्यांनी आपसात मतभेद निर्माण केले मग कोणी श्रद्धा ठेवली व कोणी द्रोहाचा मार्ग अवलंबिला. होय, अल्लाहने इच्छिले असते तर ते कदापि लढले नसते परंतु अल्लाह जे इच्छितो ते करतो. (२५२-२५३)

हे श्रद्धावंतांनो, जी काही धन-दौलत आम्ही तुम्हाला बहाल केली आहे त्यातून खर्च करा यापूर्वी की तो दिवस येईल ज्यामध्ये खरेदी-विक्री होणार नाही, मित्रताही उपयोगी पडणार नाही आणि शिफारस देखील चालणार नाही. आणि खरे अत्याचारी तेच आहेत जे द्रोहाचा मार्ग अवलंबितात. (२५४)

अल्लाह तो चिरंतनजीवी आहे ज्याने तमाम सृष्टीचा भार सांभाळलेला आहे, त्याच्याशिवाय इतर कोणीही ईश्वर नाही, तो झोपतही नाही आणि त्याला झोपेची गुंगीही येत नाही, पृथ्वी आणि आकाशांत जे काही आहे त्याचेच आहे. असा कोण आहे जो त्याच्या पुढे त्याच्या परवानगीशिवाय शिफारस करू शकेल? जे काही दासांच्या समक्ष आहे....



تلك الرسل ٣ البقرة ٢

اَيْدِيْهِمْ وَمَا خَلْفَهُمْ ۚ وَلَا يُحِيْطُوْنَ بِشَيْءٍ مِّنْ
عِلْمِهٖٓ اِلَّا بِمَا شَآءَ ۚ وَسِعَ كُرْسِيُّهُ السَّمٰوٰتِ وَ
الْاَرْضَ ۚ وَلَا يَـُٔوْدُهٗ حِفْظُهُمَا ۚ وَهُوَ الْعَلِيُّ
الْعَظِيْمُ ۝ لَآ اِكْرَاهَ فِي الدِّيْنِ ۣۙ قَدْ تَّبَيَّنَ الرُّشْدُ
مِنَ الْغَيِّ ۚ فَمَنْ يَّكْفُرْ بِالطَّاغُوْتِ وَيُؤْمِنْۢ بِاللّٰهِ
فَقَدِ اسْتَمْسَكَ بِالْعُرْوَةِ الْوُثْقٰى ۤ لَا انْفِصَامَ لَهَا ۭ
وَاللّٰهُ سَمِيْعٌ عَلِيْمٌ ۝ اَللّٰهُ وَلِيُّ الَّذِيْنَ اٰمَنُوْا ۙ
يُخْرِجُهُمْ مِّنَ الظُّلُمٰتِ اِلَى النُّوْرِ ڛ وَالَّذِيْنَ كَفَرُوْٓا
اَوْلِيٰۗـــُٔــهُمُ الطَّاغُوْتُ ۙ يُخْرِجُوْنَهُمْ مِّنَ النُّوْرِ
اِلَى الظُّلُمٰتِ ۭ اُولٰۗىِٕكَ اَصْحٰبُ النَّارِ ۚ هُمْ فِيْهَا
خٰلِدُوْنَ ۝ اَلَمْ تَرَ اِلَى الَّذِيْ حَاۗجَّ اِبْرٰهٖمَ فِيْ
رَبِّهٖٓ اَنْ اٰتٰىهُ اللّٰهُ الْمُلْكَ ۘ اِذْ قَالَ اِبْرٰهٖمُ رَبِّيَ
الَّذِيْ يُحْيٖ وَيُمِيْتُ ۙ قَالَ اَنَا اُحْيٖ وَاُمِيْتُ ۭ

....त्यालाही तो जाणतो आणि जे काही त्यांच्यापासून अदृश्य आहे त्यालाही तो जाणतो आणि त्याच्या माहितीपैकी कोणतीही गोष्ट त्यांच्या बुद्धिकक्षेत येऊ शकत नाही याव्यतिरिक्त की एखाद्या गोष्टीचे ज्ञान तो स्वतःच त्यांना देऊ इच्छित असेल. त्याचे राज्य[८८] आकाश आणि पृथ्वीवर पसरले आहे, आणि त्यांचे संरक्षण काही त्याला थकवून सोडणारे काम नव्हे. फक्त तोच एकटा महान व श्रेष्ठ आहे. (२५५)

धर्माच्या बाबतीत कोणतीही जोरजबरदस्ती नाही.[८९] सत्य असत्यापासून वेगळे केले गेले आहे. आता ज्याने कोणी, तागूत[९०] चा इन्कार करून अल्लाहवर श्रद्धा ठेवली त्याने एक असा मजबूत आधार ग्रहण केला जो कधीही तुटणार नाही, आणि अल्लाह (ज्याचा आधार त्याने घेतला आहे) सर्वकाही ऐकणारा व जाणणारा आहे. जे लोक श्रद्धा ठेवतात त्यांचा समर्थक व सहायक अल्लाह आहे आणि तो त्यांना अंधारातून काढून प्रकाशात आणतो. आणि जे लोक द्रोहाचा मार्ग अवलंबितात त्यांचे समर्थक व सहायक तागूत आहेत.[९१] आणि ते त्यांना प्रकाशापासून ओढून अंधाराकडे घेऊन जातात. हे नरकाग्नीमध्ये जाणारे लोक आहेत जेथे हे सदैव राहतील. (२५६-१५७)

तुम्ही त्या माणसाच्या अवस्थेवर विचार केला नाही काय की ज्याने इब्राहीम (अ.) शी वाद घातला होता?[९२] वाद याबाबतीत की इब्राहीम (अ.) चा पालनकर्ता कोण आहे, आणि या कारणास्तव की त्या माणसाला अल्लाहने राज्य-सत्ता देऊन टाकली होती. जेव्हा इब्राहीम (अ.) नी सांगितले की, ''माझा पालनकर्ता तो आहे ज्याच्या अखत्यारीत जीवन व मृत्यू आहे.'' तेव्हा त्याने उत्तर दिले, ''जीवन व मृत्यू माझ्या अधिकारात आहे.''....

“जेव्हा ताजमहालचे सर्व घटक एकत्र पाहता त्यामध्ये काही शंका नाही की - परमात्म्याकडे मुमताजसाठी घर तयार केल्याबद्दल देवाच्या स्वतःच्या शब्दासह, समाधीची संपूर्ण प्रतीकात्मकता त्यातून प्रकट व्हावी.” (गूगलवरून सरभेसळ भाषांतराचे समजेल अशा भाषेत स्वैर रुपांतर)

यानिमित्ताने माझ्यापाशी असलेल्या कुराणाच्या मराठी प्रतीतून ताजमहालाच्या विविध भागात कोरलेल्या आयतींचा अनुवाद वाचला तो सादर करत आहे. त्या अर्थाचा संदर्भ कसा लावावा ते वाचकांनी ठरवावे.

# ८९ सूरह अल्‌फ़ज्र

(मक्काकालीन, वचने ३०)

*अल्लाहच्या नावाने, जो अत्यंत दयावंत व असीम कृपावंत आहे.*

शपथ आहे उष:काळची आणि दहा रात्रींची आणि सम व विषमाची आणि रात्रीची जेव्हा ती निरोप घेत असेल, काय यात बुद्धी असलेल्यांसाठी एखादी शपथ आहे?[1] (१-५)

तुम्ही पाहिले नाही की तुमच्या पालनकर्त्याने काय व्यवहार केला, उंच स्तंभवाल्या आदेइरमशी....



مثلها في البلاد ۝ وثمود الذين جابوا الصخر بالواد ۝
وفرعون ذي الأوتاد ۝ الذين طغوا في البلاد ۝
فأكثروا فيها الفساد ۝ فصب عليهم ربك سوط
عذاب ۝ إن ربك لبالمرصاد ۝ فأما الإنسان إذا
ما ابتلاه ربه فأكرمه ونعمه فيقول ربي أكرمن ۝
وأما إذا ما ابتلاه فقدر عليه رزقه فيقول ربي
أهانن ۝ كلا بل لا تكرمون اليتيم ۝ ولا تحاضون
على طعام المسكين ۝ وتأكلون التراث أكلا لما ۝
وتحبون المال حبا جما ۝ كلا إذا دكت الأرض دكا
دكا ۝ وجاء ربك والملك صفا صفا ۝ وجيء يومئذ
بجهنم يومئذ يتذكر الإنسان وأنى له الذكرى ۝
يقول يا ليتني قدمت لحياتي ۝ فيومئذ لا يعذب
عذابه أحد ۝ ولا يوثق وثاقه أحد ۝ يا أيتها

....ज्यांच्या समान कोणतेही राष्ट्र जगाच्या मुलुखात निर्माण केले गेले नव्हते? आणि समूदशी ज्यांनी खोऱ्यात खडक कोरले होते? आणि मेखावाल्या फिरऔनशी, हे ते लोक होते ज्यांनी जगाच्या मुलुखात मोठा दुराचार केला होता आणि त्यांच्यात खूप उपद्रव माजविला होता. सरतेशेवटी तुमच्या पालनकर्त्याने त्यांच्यावर प्रकोपाचा कोरडा ओढला. वस्तुस्थिती अशी आहे की तुमचा पालनकर्ता दबा धरून बसला आहे.[२] (६-१४)

परंतु माणसाची स्थिती अशी आहे की त्याचा पालनकर्ता त्याची परीक्षा घेतो आणि त्याला प्रतिष्ठा आणि देणगी देतो, तेव्हा तो म्हणतो की, माझ्या पालनकर्त्याने मला प्रतिष्ठित बनविले. आणि तो जेव्हा त्याला कसोटीत घालतो आणि त्याची उपजीविका त्याच्यासाठी तंग करतो तर तो म्हणतो माझ्या पालनकर्त्याने मला अपमानित केले,[३] कदापि नाही, किंबहुना तुम्ही अनाथांशी मानाचा व्यवहार करीत नाही. आणि गरिबाला जेवू घालण्यासाठी एकदुसऱ्याला उत्तेजन देत नाही, आणि वारसाची सर्व मालमत्ता गिळंकृत करता, आणि संपत्तीच्या प्रेमात वाईटरित्या गुरफटला आहात. कदापि नाही.[४] जेव्हा पृथ्वी निरंतर वाळवंट करून टाकली जाईल आणि तुमचा पालनकर्ता प्रकट होईल, अशा स्थितीत की दूत रांगारांगानी उभे राहतील. आणि नरक त्या दिवशी समोर आणले जाईल, त्या दिवशी मानवाला समज येईल आणि त्यावेळी त्याला समज येण्याने काय हशील? तो म्हणेल की, मी आपल्या ह्या जीवनासाठी पूर्वतयारी केली असती! मग त्या दिवशी अल्लाह जी यातना देईल तशी यातना देणारा कुणी नाही, आणि अल्लाह ज्या प्रकारे बांधील तसा बांधणारा कुणी नाही. (१५-२६)

२) दबा धरून बसण्याची जागा अशी असते जेथे कुणी मनुष्य इतर कुणाच्या प्रतीक्षेत या हेतूने दबा धरून बसलेला असतो की जेव्हा तो माऱ्याखाली आला की बरोबर त्यावर हल्ला करावा. परिणामापासून बेसावध, बेपर्वाईने तो त्या ठिकाणाजवळ येतो आणि अकस्मात त्याची शिकार होते. अशीच स्थिती सर्वोच्च अल्लाहच्याविरुद्ध त्या जालिमांची आहे. त्यांनी जगात उपद्रवांचे तांडव माजविलेले असते व ईश्वरही आहे व तो त्यांना पाहात आहे, याचे त्यांना कोणतेही भान राहात नाही. ते पूर्णपणे निर्भय बनून दिवसेदिवस अधिकाधिक खोडसाळपणा करीत राहतात, येथपावेतो की जेव्हा ती सीमा गाठली जाते जिच्यापुढे सर्वोच्च अल्लाह त्यांना जाऊ देऊ इच्छित नाही त्यावेळी अकस्मातपणे त्यांच्यावर त्याच्या कोपचा कोरडा ओढला जातो.

३) म्हणजे असा आहे माणसाचा भौतिकवादी जीवन-दृष्टिकोन. या जगातच धनदौलत आणि अधिकार व सत्ता लाभण्यास तो प्रतिष्ठा आणि न मिळाल्यास आपली अप्रतिष्ठा मानतो. वास्तविकपणे खरी वस्तुस्थिती जी त्याच्या लक्षात येत नाही, अशी आहे की अल्लाहने ज्या कुणास जगात जे काही दिलेले आहे, परीक्षा घेण्यासाठी दिलेले आहे. श्रीमंती व सत्ता यातही परीक्षा आहे, तसेच गरिबीदेखील कसोटी आहे.

४) म्हणजे तुमची ही कल्पना चुकीची आहे की जगात जीवन जगतांना तुम्ही हे सर्वकाही करीत राहावे व त्याच्या जाब विचारण्याची वेळ कधीच येऊ नये.

लेडी न्यूजंट यांच्या सांगण्यावरून १८१२ साली दिल्ली वा आग्र्यातील कोणी एक मारिया नावाच्या कलाकाराकडून, हे कुराणातील सुलूस लिपीतून अरेबिक लेखन करवून घेतले गेले. त्यात सुरा ४० श्लोक ७ व ८ , सुरा ४१ श्लोक ३० व मधे (गूगलचे भाषांतर मासला म्हणून देत आहे. ‘जे स्वर्गात वचन देतात आणि जे त्यांच्या वाडवडिलांच्या पूर्वजांसमवेत योग्य मार्गाचा अवलंब करतात त्यांना सार्वकालिक बागांचा दावा करतात, पती / पत्नी आणि संतती '.

शेजारच्या फोटोत वर च्या चौकटीत शीर्षक मानले तर खाली ११ श्लोक आहेत असे वाटते.



हाच भाग मौदूदींच्या मराठी कुअरान प्रतीत असा आहे.

सुरा ४० मधील ७-९ - १२ श्लोक



العرش ومن حوله يسبحون بحمد ربهم ويؤمنون
به ويستغفرون للذين آمنوا ربنا وسعت كل شيء
رحمة وعلما فاغفر للذين تابوا واتبعوا سبيلك
وقهم عذاب الجحيم ۝ ربنا وأدخلهم جنات عدن
التي وعدتهم ومن صلح من آبائهم وأزواجهم
وذرياتهم إنك أنت العزيز الحكيم ۝ وقهم السيئات
ومن تق السيئات يومئذ فقد رحمته وذلك هو
الفوز العظيم ۝ إن الذين كفروا ينادون لمقت الله
أكبر من مقتكم أنفسكم إذ تدعون إلى الإيمان
فتكفرون ۝ قالوا ربنا أمتنا اثنتين وأحييتنا
اثنتين فاعترفنا بذنوبنا فهل إلى خروج من
سبيل ۝ ذلكم بأنه إذا دعي الله وحده كفرتم وإن
يشرك به تؤمنوا فالحكم لله العلي الكبير ۝ هو

ईश-सिंहासनधारी दूत आणि जे ईश-सिंहासनाच्या सभोवती उपस्थित राहतात, ते सर्व आपल्या पालनकर्त्याच्या स्तुतीबरोबरच त्याचे पावित्र्यगान करीत आहेत. ते त्याच्यावर श्रद्धा ठेवतात आणि श्रद्धा ठेवणाऱ्यांसाठी क्षमेची प्रार्थना करतात. ते म्हणतात, ''हे आमच्या पालनकर्त्या, तू आपली कृपा व आपल्या ज्ञानानिशी प्रत्येक चराचरास व्यापिले आहेस, म्हणून क्षमा कर आणि नरकाच्या यातनेपासून वाचव, त्या लोकांना ज्यानी पश्चाताप व्यक्त केला आहे आणि तुझा मार्ग स्वीकारला आहे. हे आमच्या पालनकर्त्या, आणि दाखल कर त्यांना सदैव राहणाऱ्या त्या स्वर्गामध्ये ज्यांचे तू त्यांना वचन दिले आहेस, आणि त्यांच्या आईवडील आणि पत्नी व संततीपैकी जे सदाचारी असतील (त्यांनासुद्धा तेथे त्यांच्याबरोबर पोहचव) तू निःसंशय सामर्थ्यसंपन्न आणि बुद्धिमान आहेस. आणि वाचव त्यांना वाईट गोष्टीपासून. ज्याला तू वाईट गोष्टीपासून पुनरुत्थानाच्या दिवशी वाचविले त्यावर तू मोठी मेहरबानी केलीस, हेच महान यश आहे.'' (७-९)

ज्या लोकांनी द्रोह केलेला आहे, पुनरुत्थानाच्या दिवशी त्यांना हांक मारून सांगितले जाईल, ''आज तुम्हाला जितका भयंकर राग स्वत:वर येत आहे, अल्लाह तुम्हावर त्यापेक्षा जास्त क्रोधित त्यावेळी होतअसे जेव्हा तुम्हाला श्रद्धेकडे बोलविण्यात येत होते आणि तुम्ही द्रोह करीत होता.'' ते म्हणतील, ''हे आमच्या पालनकर्त्या, तू खरोखर आम्हाला दोन वेळा मृत्यू आणि दोन वेळा जीवन दिले,' आता आम्हीआपले गुन्हे मान्य करतो, आता येथून निघण्याचा एखादा मार्ग आहे काय?'' (उत्तर मिळेल) ''ही स्थिती ज्यामध्ये तुम्ही गुरफटलेले आहात, अशा कारणाने आहे की जेव्हा एकट्या अल्लाहकडे बोलाविले जात होते तेव्हा तुम्ही मानण्यास नकार देत होता, आणि जेव्हा त्याच्याबरोबर दुसऱ्यांना बोलाविले जात असे तेव्हा तुम्ही मान्य करीत होता, आता निर्णय श्रेष्ठ व उच्चतर अल्लाहच्या हाती आहे.'' (१०-१२)

सुरा ४१ मधील १९ ते ३० श्लोक -



वरील लेखाचा उद्देश असा आहे की ताज महालातील हस्तकलेच्या उन्नत लेखनशैलीची तारीफ करायला हवी. त्याच बरोबर त्या संस्कृतीच्या लेखी कुअराणामधील विचारधन काय असते यावर प्रकाश टाकला जावा. ताजमहाल पहाताना या बाबींकड लक्ष द्यायला शक्य नसते. फोटोतून पहायला मिळाले व विचारले की काय या पट्टीतील लेखनात लिहिले असते तर लोक "काय की" म्हणतात किंवा तोंडाचा चंबू करून "पुर्ऱ्ऱ" करून दोन्ही हातानी माहित नाही असे म्हणताना दिसतात. तसे होऊ नये ...

....

मिपावर २९१८ (२०२४मधे) वाचने तेथील वाचकांची प्रतिक्रिया

प्रतिक्रिया



विचार करायला लावणारे लिखाण

4 Jul 2020 - 11:00 am | *दुर्गविहारी*

विचार करायला लावणारे लिखाण आहे.

- प्रतिसाद द्या

धन्यवाद दुर्गविहारी

5 Jul 2020 - 3:14 pm | *शशिकांत ओक*

प्रत्येक गड आणि किल्ल्यावरील शीलालेख, प्राचीन भाषेतील लिखाण यावर गड प्रेमींनी काही शोधकार्य करून तिथे घडलेल्या ऐतिहासिक घटनांचा आढावा घ्यावा, यातून भाषा, लिपी, लेखन पद्धती यावर प्रकाश टाकला जाऊ शकतो.हागिया सोफिया आणि ताजमहाल

10 Jul 2020 - 7:39 pm | *शशिकांत ओक*

तुर्कस्थान मधील सुप्रिम कोर्टात निर्णय घेतला गेला की १९३४ साला पासून चर्च (म्युझियम) म्हणून मान्यता पावलेली इमारत ही 'मशीद' आहे असे मानले

जावे... तुर्की पंतप्रधान एर्दोगान तसे पुकारणार आहेत.
हे नेमके 'ताजमहाल ला' मंदिर म्हणून मानले जावे या भारतीयांच्या अपेक्षेप्रमाणे आहे.
इस्तंबूल या शहरात ही वास्तू १६०० वर्षापासून उभी होती. साधारण ६शे वर्षांपूर्वी ती मुस्लिमांनी हस्तगत केली. मशीद म्हणून वापरली. शहराचे नाव कॉन्टँटिनोपल अशा बायझंटाईन (ख्रिश्चन) काळातील नावाला बदलून इस्तंबूल केले.
युरोपियन देशांच्या दबावाखाली १९३४ पासून हा ख्रिती चर्च वास्तू समुह मशिदी ऐवजी म्युझियम म्हणून सर्व धर्माच्या लोकांना पहायला अभ्यासायला उघडला गेला.
'ताजमहाल या बाबतीत ही कबर इमारत या आधी मंदिर समूह म्हणून बांधली मंदिर होती' असे मानले जावे असा निर्णय सुप्रिम कोर्टात दिला जावा अशी केस करून निर्णय मिळवला जावा.

स्वामी

**11 Jul 2020 - 8:02 pm** | *रमेश आठवले*

भाजपाचे राज्यसभा खासदार सुब्रमणियम स्वामी यांच्याशी समर्क करा. ते अशा केसेस सर्वोच्च न्यायालयात लढवतात आणि बहुधा जिंकतात. रामसेतु आणि अयोध्या केसेस मध्ये त्यांनी भाग घेतला होता. वाराणसीच्या विश्वनाथ मंदिराच्या जवळ ज्ञानवापी हे संस्कृत नाव असलेली मशीद आहे. ती केस त्यांनी सध्या हातात घेतली आहे.

- प्रतिसाद द्या



स्वामी आणि ताजमहाल

**11 Jul 2020 - 10:06 pm | *शशिकांत ओक***

ताज महल केसवर ते काम करतील असे वाटते.